मुख्यमंत्री ग्रामसडक योजना
सन २०१९-२० या वित्तीय वर्षात बॅच १ अंतर्गत
जळगांव जिल्हयातील रस्त्यांची दर्जोन्नती
करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुग्रायो-२०१९/प्र.क्र.८१/बांध-४**
बांधकाम भवन, ५ वा मजला, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख: २ फेब्रुवारी, २०१९

**वाचा**

१) शासन निर्णय ग्रामविकास विभाग क्र. ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दि. २८.१०.२०१५
२) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. ग्रासयो-२०१५/प्र.क्र.८/पंरा-७, दि. ११.१२.२०१५
३) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. मुग्रायो -२०१८/प्र. क्र.५५५/बांधकाम-४, दि.२६.०६.२०१८
४) मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे यांचे पत्र जा.क्र. मु.अ./प्रमंग्रासयो /१५२/१९, दि.१८.०१.२०१९

**शासन निर्णय -**

मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत प्रस्तावित एशियन डेव्हलपमेंट बँक अर्थसहाय्यित जळगांव जिल्हयासाठी सन २०१९-२० या वित्तीय वर्षात Batch-१ अंतर्गत दिलेल्या उद्दिष्टानुसार खालील यादीमधील रस्त्यांच्या कामांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या किंमतीस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | तालुका | पॅकेज क्रमांक | रस्त्याचे नाव | लांबी (कि.मी.) | कामाची अंदाजीत रक्कम (रु. लक्ष) | कामाची ५ वर्षे नियमित देखभाल व दुरुस्ती अंदाजीत रक्कम (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | अमळनेर | ADB-JLG-०१ | मारवाडते भोरटेक रस्ता | ३.५१ | २२३.०० | ११.०५ |
| २. | | | पातोंडा ते दापोरी रस्ता | २.०० | १२९.५७ | ६.४२ |
| ३. | | | टाकरखेडा ते कंडारी रस्ता | ३.३० | २०२.४८ | ९.९८ |
| ४. | | | प्रजिमा-५२ ते कामतवाडी रस्ता | ४.३० | ३१६.०९ | १५.६८ |

| अ. क्र. | तालुका | पॅकेज क्रमांक | रस्त्याचे नाव | लांबी (कि.मी.) | कामाची अंदाजीत रक्कम (रु. लक्ष) | कामाची ५ वर्षे नियमित देखभाल व दुरुस्ती अंदाजीत रक्कम (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| ५. | चाळीस गाव | ADB-JLG-०२ | रामा-१९ते पिंपळवाड-म्हाळसा ते वरखेड खु. रस्ता (भाग लांबी पिंपळवाड-म्हाळसा ते वरखेडखु.) | ३.५४ | २४३.०४ | १२.०५ |
| ६. | | | हिरापूर ब्राम्हण शेवगेपिंपरी शिरसगाव तळोदा रस्ता (भाग लांबी ब्राम्हण शेवगे-पिंपरी बु. -शिरसगाव रस्ता ) | ३.८७ | ४०२.३३ | १९.९५ |
| ७. | | | लोंढे तेधुळे जिल्हा हद्द - तरवाडे रस्ता | ४.२० | २६४.०७ | १३.०८ |
| ८. | | | प्रजिमा-४० ते ढोमणे रस्ता | २.०० | १३०.६६ | ६.४८ |
| ९. | | | इजिमा-७१ खेर्डे ते सोनगाव रस्ता | १.२० | ८६.५२ | ४.२९ |
| १०. | | | राम-१९ ते हिंगोणा सीम रस्ता | ०.८० | ६३.३१ | ३.१४ |
| ११. | जळगाव | ADB-JLG-०३ | प्रजिमा-०८ते निमगाव रस्ता | १.०५ | १२३.३७ | ६.१२ |
| १२. | | | रा.म.मा.-०६ ते तिघे रस्ता | १.१७ | ७७.५८ | ३.८५ |
| १३. | | | रामा - ४० ते आव्हाने रस्ता | १.७४ | १६३.२२ | ८.११ |
| १४. | | | भोकर ते पळसोद (रामेश्वर)रस्ता | २.९७ | ३०३.९३ | १५.०९ |
| १५. | जामनेर | ADB-JLG-०४ | इजिमा-४२ते आंबीहोळ देवीचे रस्ता | ३.०० | २३६.२० | ११.७१ |
| १६. | | | प्रजिमा-३२ ते पळासखेडा काकर रस्ता | १.५४ | १२४.५५ | ६.१७ |
| १७. | | | रामा-४२ ते बिलखेडा रस्ता | ४.२६ | ४१८.३२ | २०.७३ |
| १८. | | | प्रजिमा-०५ ते मालदाभाडी (नवी दाभाडी) रस्ता | ५.५९ | ५२३.२० | २५.९४ |
| १९. | मुक्ताई नगर | ADB-JLG-०५ | इजिमा-२८ ते शेमाळदे रस्ता | ५.७९ | ३५९.८७ | १७.८३ |
| २०. | | | प्रजिमा-०५ ते रामगड रस्ता | १.६५ | ९६.८१ | ४.७७ |
| २१. | | | इजिमा-०८ (भामनोद) ते सनसावखेडा रस्ता | ४.०५ | ३१४.९४ | १५.५५ |
| २२. | यावल | ADB-JLG-०६ | रामा-४३ ते टाकरखेडा रस्ता | २.६५ | १९८.७५ | ९.८६ |
| २३. | | | दहीगाव ते नावरा रस्ता | ५.१३ | ३९९.३५ | १९.८२ |
| २४. | | | इजिमा-२८ ते शेमाळदे रस्ता | ३.८८ | ३०५.१० | १५.१४ |
| | | | **एकुण** | **७३.१९** | **५७०६.२६** | **२८२.८१** |

१. सदर कामे ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर / ADB च्या निकषानुसार व ग्राम विकास विभागाच्या अटी व शर्तीवर कार्यान्वीत करण्यात यावीत.

२. मुख्य अभियंता (प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना) , अधीक्षक अभियंता (प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना) व कार्यकारी अभियंता (प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना) यांनी सक्षम अधिकाऱ्याच्या स्तरावर नियमानुसार प्रत्येक रस्त्याला तांत्रिक मान्यता द्यावी.

३. मुख्य अभियंता तसेच अधीक्षक अभियंता (प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना) प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना यांनी रस्त्याचे दर्जोन्नती करण्यासाठी ADB बँकेने मान्यता दिलेल्या SBD नुसार ई-टेंडरिंग करुनच कार्यारंभ आदेश देण्यात यावेत.

४. ADB बँक अर्थसहाय्यित कामांसाठी सदर बँकेने निश्चित केलेल्या अटी / शर्ती तसेच मार्गदर्शक सुचनांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

५. प्रस्तुत कामास तांत्रिक मंजुरी देण्यापुर्वी व काम सुरु करण्यापुर्वी पुढील बाबींची पुर्तता करण्यात यावी.

i) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापुर्वी रस्त्याच्या कामाचा वाव, Pavement Design व Hydraulic Calculations पुनश्च: काटेकोरपणे तपासण्यात येवुन त्याप्रमाणे संकल्पन निश्चित करण्यात यावे.

ii) सदर रस्त्यासाठी लागणारी जमीन या विभागाच्या ताब्यात आहे याची खातरजमा करुन घ्यावी. खाजगी जमीन अथवा वन विभागाची ना-हरकत प्रमाणपत्र आवश्यक असलेल्या रस्त्यांची कामे हाती घेण्यात येवु नयेत, याबाबत पुनश्च् खात्री करण्यात यावी.

iii) तांत्रिक मान्यता देणाऱ्या प्राधिकाऱ्याने हे काम कोणत्याही पाटबंधारे / जल विद्युत पाणीपुरवठा प्रकल्पाच्या जलाशयाखाली जाण्याची शक्यता नाही किंवा अशा प्रकल्पांमुळे या कामावर कोणताही परिणाम होणार नाही याची खात्री करावी.

iv) अंदाजपत्रकामध्ये कामाची मराठीमधुन माहिती दर्शविणाऱ्या फलकाची तरतुद केलेली असावी.

v) प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकात प्रत्येक दराचे वर्णन / दर / दर पृथ:करण / रक्कम / दर पृथ:करणातील गृहित धरलेली अंतरे व अनुषंगिक इतर बाबी तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिकाऱ्यांनी त्यांच्या पातळीवर तपासणे अनिवार्य आहे. या संदर्भात शासनाचे कोणतेही उत्तरदायित्व असणार नाही.

vi) तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्याने कामामध्ये प्रस्तावित वाव अन्य कोणत्याही योजनेत / कार्यक्रमात समाविष्ठ नाही तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, महानगरपालिका, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ इत्यादी तत्सम यंत्रणेकडे मंजुर नाही याची खातरजमा करावी.

vii) सदर कामांना सन २०१८-१९ च्या अद्ययावत दरसुचीनुसार तांत्रिक मंजूरी देण्यात यावी.

viii) सदर कामांची नोंद मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी तयार करण्यात आलेल्या संगणक प्रणालीमध्ये संबंधित कार्यकारी अभियंता यांनी त्वरीत करावी.

६. सदर कामावरील खर्च मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००)(०१) , मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे सीआरसी - ५०५४ ५१५३ या शिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०२१२२३४३९६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE

Digitally signed by RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, postalCode=400001, street=RURAL DEVELOPMENT DEPT,BANDHKAM BHAVAN,25MARZBAN ROAD,FORT,MUMBAI, serialNumber=d404eac17c41303f055a321c8b78aa06691d96f89d2b59532f46b0d468148ae1, ou=RURAL DEVELOPMENT DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE
Date: 2019.02.02 12:40:01 +05'30'

**(र.आ.नागरगोजे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा / विधानपरिषद
२) जिल्हाधिकारी , जळगांव
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , जळगांव
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक
५) मुख्य अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे
६) खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.वि.) मंत्रालय मुंबई ४०० ०३२
७) अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, नाशिक
८) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जळगांव
९) कार्यकारी अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना,महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, जळगांव
१०) कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, जळगांव
११) जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव
१२) श्री. एस.सी. मोने, वित्तीय सल्लागार, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना
१३) माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य
१४) निवड नस्ती ( बांधकाम-४) ग्राम विकास विभाग.